अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील सहसंचालक, गट-“अ”
(राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीबाबत

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
### शासन आदेश क्रमांकः पदोनि-१०१६/प्र.क्र. ४९/का-१४२७

मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १८ नोव्हेंबर, २०१६

संदर्भ :- शासनाचे समक्रमांक दिनांक ९.०६.२०१६ रोजीचे आदेश.

## शासन आदेश

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक,गट-अ (राजपत्रित) संवर्गातील श्री.वि.वा.गवळी, जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, मुंबई शहर यांची सहसंचालक, गट-“अ” (राजपत्रित) संवर्गातील सहसंचालक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास महामंडळ, मुंबई या पदावर संदर्भाधीन दिनांक ९.०६.२०१६ च्या आदेशान्वये पदोन्नतीने पदस्थापना करण्यात आली होती. तथापि, संबंधित कार्यालयाने श्री.गवळी यांना रुजू करुन न घेता त्यांच्या सेवा मुळ विभागास परत केल्या. त्यामुळे श्री.गवळी हे सध्या पदस्थापनेच्या प्रतिक्षेत आहेत. संदर्भाधीन आदेशातील सदरहू पदस्थापनेत सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने बदल करण्यात येत असून, श्री.गवळी यांची पदस्थापना स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव, दिनांक ९.०६.२०१६ च्या आदेशान्वये देण्यात आलेल्या पदस्थापनेचे पदनाम व कार्यालय | सद्य:स्थितीत कार्यरत असलेले पदनाम व कार्यालयाचे नाव | बदलीनंतरचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | श्री. वि.वा.गवळी, सहसंचालक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास महामंडळ, मुंबई | पदस्थापनेच्या प्रतिक्षेत | सहसंचालक (संगणित्र), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई |

२. श्री.वि.वा.गवळी यांनी नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे तसेच संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांनी श्री.गवळी यांना सहसंचालक पदावर तात्काळ रुजू करुन घ्यावे.

३. बदली झालेले अधिकारी बदलीच्या कार्यालयात रुजू झाल्यानंतर त्यांनी तात्काळ संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्याशी संपर्क साधून ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची कार्यवाही सात दिवसांच्या आत करावी. अद्ययावत केलेले ई-प्रोफाईल संबंधित कार्यालयाने संबंधित अधिकाऱ्याच्या त्या महिन्याच्या वेतन देयकासोबत कोषागार कार्यालयास सादर केल्याशिवाय त्यांचे वेतन देयक कोषागार कार्यालयाने पारित करु नये. तसेच, अद्ययावत ई-प्रोफाईलच्या प्रती संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई व शासनास पाठविण्यात याव्यात. ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची जबाबदारी संबंधित कार्यालयप्रमुखांची राहील.

४. संबंधित कार्यालयप्रमुखांनी बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास कार्यमुक्त केल्याबाबतच्या व रुजू करुन घेतल्याच्या आदेशाची प्रत या विभागास अग्रेषित करावी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११८११४९४९८४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=55fdd77fa8877b50fd182206f763c590c30ce698809f79d37b145fd63e375059, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2016.11.18 17:12:16 +05'30'

**( प्रियांका रं.छापवाले )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा),महाराष्ट्र-१ व २ मुंबई/नागपूर.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (नियोजन)/मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
५. सचिव, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, मुंबई
६. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
७. सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नवी मुंबई/ पुणे/ नाशिक / औरंगाबाद / अमरावती /नागपूर.
८. उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग / नवी मुंबई /पुणे /नाशिक / औरंगाबाद / अमरावती /नागपूर.
९. उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१०. अवर सचिव,सामान्य प्रशासन विभाग (का.१२/का.१६ ब), मंत्रालय,मुंबई.
११. अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
१२. लेखा अधिकारी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई/लेखाकोष भवन, वांद्रे (पू.) मुंबई- ५१.
१४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१५. श्री. वि.वा.गवळी, सहसंचालक (अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत).
१६. निवड नस्ती.